**महाराष्ट्र शासन**

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन आदेश क्रमांक : बदली-२३२३/प्र.क्र.४९/ना.पु.१५.**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक : २४ एप्रिल, २०२३.

<u>वाचा:</u>- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.

२) उप आयुक्त (पुरवठा), पुणे विभाग, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र.पुशा/कार्या३/१८३/२०२३, दि.०६.०३.२०२३.

**<u>शासन आदेश-</u>**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४)(दोन) अनुसार सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने खालील परिमंडळ अधिकारी यांची त्यांचे नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात येत आहे :-

| **अ. क्र.** | **परिमंडळ अधिकारी यांचे नाव** | **सध्या कार्यरत ठिकाण** | **बदलीनंतर पदस्थापनेचे ठिकाण** |
|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** |
| १ | श्री.दिनेश नामदेव तावरे | परिमंडळ अधिकारी, अ विभाग, निगडी, पुणे | परिमंडळ अधिकारी, ड विभाग, हडपसर, पुणे |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. उप आयुक्त (पुरवठा), पुणे विभाग, पुणे यांनी उपरोक्त अधिकाऱ्याला दि.२४.०४.२०२३ रोजी (म.नं.) कार्यमुक्त करण्यात यावे व श्री.डी.एन.तावरे यांनी दि.२५.०४.२०२३ रोजी बदलीच्या पदावर रूजू व्हावे.तसेच, संबंधित अधिकारी यांना त्यांच्या बदलीच्या पदावर रुजू करून घेऊन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

३. वरीलप्रमाणे पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकाऱ्याला पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये व महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारू नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोचदेय डाकेने परत करावेत.

४. सदरची बदली श्री. तावरे यांच्या विनंतीवरून करण्यात येत असल्याने त्यांना महाराष्ट्र नागरी सेवा ( पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार पदग्रहण अवधी तसेच बदली विषयक प्रवासभत्ता व इतर अनुषंगिक लाभ अनुज्ञेय राहणार नाहीत.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४२४१५०६२०४९०६ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by GAJANAN RAMDAS DESHMUKH
Date: 2023.04.24 15:16:46 +05'30'

**( गजानन रा. देशमुख )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

श्री.दिनेश नामदेव तावरे, परिमंडळ अधिकारी, अ विभाग, निगडी, पुणे, ( यांना उप आयुक्त (पुरवठा), पुणे विभाग, पुणे यांच्यामार्फत. )

**प्रत:-**

१) विभागीय़ आयुक्त, पुणे विभाग , पुणे .
२) उप आयुक्त (पुरवठा), पुणे विभाग, पुणे
३) मा. मंत्री (अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) सचिव (अ.ना.पु. व ग्रा.सं.) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल महाराष्ट्र-१ ( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा ), मुंबई
६) अन्नधान्य वितरण अधिकारी, पुणे.
७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८) निवडनस्ती,ना.पु.-१५.